**सहकार व पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राजस २०१४/प्र.क्र.३५७/ ५ स**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
तारीख: ३१ डिसेंबर,२०१४

**वाचा -**

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

२)सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन राजपत्र क्र.राजस १००६/प्र.क्र.१२८/५-स, दि.२४/८/२००६

**प्रस्तावना -**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्या विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी बदली अधिनियम, २००५ अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम ६ मधील दुसरे परंतुकातील तरतुदीनुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिपत्याखालील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे काही अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्या विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी बदली अधिनियम, २००५ च्या कलम ६ मधील दुसऱ्या परंतुकानुसार व कलम ७ नुसार सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिपत्याखालील पुढील तक्त्यात स्तंभ क्र.२ येथे नमूद केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्यात येत असून संबंधितांच्या बदल्यांचे अधिकार स्तंभ क्र.४ येथे नमूद केलेल्या अधिकाऱ्यांना प्रदान करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | शासकीय कर्मचाऱ्यांचे गट व पदनाम | वेतनश्रेणी | सक्षम प्राधिकारी | या आदेशान्वये बदली अधिकार प्रत्यार्पित करण्यात आलेले अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | अपर आयुक्त व विशेष निबंधक/ पणन संचालक (गट-अ) | रु.३७,४००-६७,००० ग्रेड पे रु.८८०० | मा.मुख्यमंत्री | मा.मंत्री (सहकार) |
| २ | अपर निबंधक/संचालक (गट- अ) | रु.३७,४००-६७,००० ग्रेड पे रु.८७०० | मा.मुख्यमंत्री | मा.मंत्री (सहकार) |
| ३ | सहनिबंधक/सहसंचालक (गट-अ) | रु.१५,६००-३९,१०० ग्रेड पे रु.६६०० | मा.मुख्यमंत्री | मा.मंत्री (सहकार) |
| ४ | उपनिबंधक/विशेष लेखापरिक्षक वर्ग-१ | रु.१५,६००-३९,१०० ग्रेड पे रु.५४०० | मा.मंत्री (सहकार) | सचिव (सहकार) |
| ५ | सहायक निबंधक/ विशेष लेखापरिक्षक वर्ग-२ / सहायक संचालक (गट-ब) | रु.९,३००-३४,८०० ग्रेड पे रु.४,४०० | मा.मंत्री (सहकार) | सचिव (सहकार) |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२३११२३०३७५८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Pandurang Pandhare

Digitally signed by Sunil Pandurang Pandhare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Pandurang Pandhare
Date: 2015.01.01 17:15:09 +05'30'

( सुनिल पांढरे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक
३) मा.मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव

४) मा.राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
७) अ.मु.स. (पणन), यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.
८) अ.मु.स. (वस्त्रोद्योग), यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव (पदुम), यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई
१०) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
११) सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
१४) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य पुणे -१
१५) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती.